विक्रीकर विभागामार्फत "ई-कर" भरणा
सुविधा सुरु करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : विकअ-२००९/प्र.क्र.८८/कोषागार-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २ जानेवारी,२०१०.

<u>प्रस्तावना :</u>

"ई-गव्हर्नन्स" प्रणालीला चालना देण्यासाठी महाराष्ट्र राज्याने महत्त्वाची अग्रेसर भूमिका स्विकारलेली आहे. शासनाच्या विविध विभागामार्फत जनतेकडून कर व करेतर रकमा, तसेच इतर शासकीय महसूल भरणा करण्यासाठी संगणकीय प्रणालीचा विकास करण्यात येत आहे. विक्रीकर विभागामार्फत विवरणपत्रे स्विकारण्यासाठी संगणकीय प्रणाली विकसित केलेली आहे. विक्रीकर व करेतर रकमेचा भरणा नोंदित व्यापाऱ्याने संगणकीय प्रणालीमार्फत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>शासन निर्णय :</u>

विक्रीकर व करेतर महसूलाचा भरणा नोंदित व्यापाऱ्यांनी संगणकीय प्रणालीद्वारे करण्याची सुविधा शासन उपलब्ध करुन देत आहे. त्यासाठी नोंदित व्यापाऱ्याने महाराष्ट्र कोषागार नियम, ११२ अनुसार विहित करण्यात आलेल्या नमुना क्रमांक ६ "ई-कर" भरणा करण्यासाठी वापरावा. या सुविधेमध्ये खालील बाबी अंतर्भूत असतील.

(१) प्रस्तुत ई-कर भरणा प्रक्रियेमध्ये समाविष्ट असलेल्या प्रत्येक बँकेस आपली एक शाखा मुंबई मध्ये 'समन्वयक बँक शाखा' (Nodal Branch) म्हणून घोषित करणे अनिवार्य असेल.

(२) सदर समन्वयक बँकेने कुठल्याही प्रकारचा कर भरणा संगणकीय प्रणाली व्यतिरिक्त इतर पध्दतीने म्हणजेच प्रत्यक्ष कर भरणा (Manual Payment) स्विकारू नये.

(३) प्रत्येक बँकेने घोषित केलेल्या समन्वयक बँकेस भारतीय रिझर्व्ह बँकेची ई-पेमेंट प्रक्रियेमध्ये समाविष्ट होण्यासाठी पूर्व परवानगी घेणे अनिवार्य असेल. त्यासाठी संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई यांच्याकडून ना-हरकत प्रमाणपत्र घेणे बंधनकारक असेल.

(४) भारतीय रिझर्व्ह बँकेच्या निर्देशानुसार प्रस्तुत समन्वयक बँकेने प्रत्येक दिवसाचा करभरणा टी + १ या कालावधीत भारतीय रिझर्व्ह बँकेत जमा करावा. ज्यामध्ये "टी" म्हणजे ज्या तारखेला समन्वयक बँकेला करभरणा प्राप्त झाला तो दिनांक. वरील प्रमाणे समय मर्यादेचे पालन समन्वयक बँकेने न केल्यास त्यासाठी दंडात्मक व्याज लावण्याचे अधिकार अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना देण्यात आलेले आहेत. सदर सुविधा

सुरु झाल्यापासून पहिल्या तीन महिन्यात टी+१ मध्ये भरणा केलेल्या दिवसाचा (Put through date) समावेश राहणार नाही.

(५) समन्वयक बँकेने भारतीय रिझर्व्ह बँकेत विक्रीकर व इतर रक्कमेचा भरणा केल्यानंतर त्याबाबतच्या प्रत्येक अधिनियमांतर्गत प्राप्त होणाऱ्या रक्कमेचा "ई-पेमेंट स्क्रोल" विक्रीकर विभागाच्या संकेतस्थळावर अपलोड करावा. या स्क्रोल प्रमाणे एकूण जमा महसूल हा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे वर्ग करण्यात येणाऱ्या रकमे इतकाच असावा.

(६) समन्वयक बँकेने "ई-पेमेंट स्क्रोल" मुद्रित (Print) करुन त्याप्रमाणे देय असणाऱ्या रक्कमेचा कर भरणा भारतीय रिझर्व्ह बँकेच्या विक्रीकराबाबतच्या खात्यात जमा करावा.

(७) "ई-पेमेंट स्क्रोलची" मुद्रीत प्रत, तसेच त्याबाबत इतर आवश्यक ते दस्तऐवज भारतीय रिझर्व्ह बँकेस पाठविणे आवश्यक राहील. प्रचलित पध्दतीनुसार चलनाच्या प्रती भारतीय रिझर्व्ह बँकेला व त्यामार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना पाठविण्याची आवश्यकता राहणार नाही.

(८) भारतीय रिझर्व्ह बँकेने प्राधिकृत केलेल्या समन्वयक बँकेच्या शाखेमधून (Nodal Branch) "ई-कर" भरणा स्विकृत करुन तो सध्या अस्तित्वात असलेल्या विक्रीकर विषयक खात्यात जमा करावा.

(९) भारतीय रिझर्व्ह बँक समन्वयक बँकेकडून प्राप्त "ई -पेमेंट स्क्रोल"च्या मुद्रीत प्रती पुढील कार्यवाही करिता आपल्या स्क्रोलबरोबर अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांना पाठवील.

(१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई हे ई-पेमेंटद्वारे शासनास वरील प्रमाणे प्राप्त झालेल्या रकमांचे लेखांकन सदर स्क्रोलच्या आधारे प्रचलित कायद्यातील तरतुदीनुसार करतील.

(११) विक्रीकर विभागाने अधिदान व लेखा कार्यालयाबरोबर जमेचा मासिक मेळ घेणे आवश्यक राहील.

(१२) ई-कर भरणा करण्याची कार्यपध्दती विक्रीकर विभागाकडून परिपत्रकाद्वारे जाहीर करण्यात येईल.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००१०२१६४०३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

तु.ज. गवरे

(तु. ज. गवरे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई (२०प्रती),
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३. महालेखापाल, (लेखा परिक्षा) २, महाराष्ट्र,मुंबई,

४. भारतीय रिझर्व्ह बँक, मुख्य इमारत फोर्ट, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. ग्रंथपाल आणि संशोधन अधिकारी, ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, सहावा मजला, विधानभवन मुंबई.
१०. निवड नस्ती, कराधान-२,

प्रत माहितीसाठी अग्रेषित

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (सर्व)
४. मा.राज्यमंत्री (सर्व)
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.